सन २०२४-२५ करिता लेखाशीर्ष क्र. २७११ ०९२२ आशियाई विकास बँक अर्थसहाय्यीत "महाराष्ट्र शाश्वत पर्यावरणपूरक किनारा संरक्षण व व्यवस्थापन प्रकल्प या योजनेकरिता रू. ६.०० कोटी निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांकः बीजीटी-११२४/प्र.क्र.८२/बंदरे-२**
गृह विभाग, मंत्रालय
मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २७ मार्च, २०२५

**संदर्भ:-** १. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३ दि. २५.०७.२०२४ व दि. १२/०२/२०२५
२. महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाचे पत्र जा क्र.ममेबो/एडीबी-पीएमयू/१२/२०२२

**शासन ज्ञापन :-**

महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडून राबविण्यात येणाऱ्या "आशियाई विकास बँक अर्थसहाय्यीत महाराष्ट्र शाश्वत पर्यावरणपूरक किनारा संरक्षण व व्यवस्थापन प्रकल्प" (सहायक अनुदाने लेखाशीर्ष क्र. २७११ ०९२२) करीता सन २०२४-२५ मध्ये रू. ६.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे. खालील कामांसाठी रू. ६.०० कोटी (अक्षरी रु. सहा कोटी फक्त) इतका निधी या शासन ज्ञापनाव्दारे मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांना वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अनु.क्र. | कामांचे नाव | रक्कम (कोटी) |
|---|---|---|
| १. | प्रकल्पाच्या कामाकरिता (लेखाशीर्ष क्र. २७११०९७६ अंतर्गत वितरीत झालेले रु.२१ कोटी) वस्तू व सेवाकर १८ टक्के दराने | रु.३.७८ |
| २. | कार्यालयीन खर्च, वेतन भत्ते, प्रशिक्षण, प्रवास खर्च, वाहन भत्ते, इ. प्रशासकीय खर्च | रु.२.२२ |
| एकूण | | रु.६.०० |

२. सदर निधी ज्या कामांकरीता वितरीत करण्यात येत आहे, त्याच कामांवर प्राप्त प्रशासकीय मान्यता /सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व विहित कालावधीत खर्ची पडेल, याबाबत आवश्यक ती दक्षता घेण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांची राहील.

३. सदर निधी खर्च करतांना वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि. २५.०७.२०२४ व दि. १२/०२/२०२५

च्या शासन निर्णय व परिपत्रकातील सूचनांचे व तरतुदीचे पालन करण्यात यावे. तसेच, सदरचा निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च न होता बँक खात्यात, स्वीय प्रपंजी खात्यात अथवा शासकीय लेख्याबाहेर ठेवता येणार नाही.

४. सदरचा निधी दि.३१.०३.२०२५ पूर्वी खर्च करून खर्चाची उपयोगीता प्रमाणपत्रे शासनास सादर करण्यात यावी.

५. या वितरीत करावयाच्या तरतुदीकरीता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून लेखाधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड हे राहतील.

६. यासाठी होणारा खर्च “मागणी क्र. बी-८, लेखाशीर्ष क्र. २७११- ०२, सागरी धूप प्रतिबंधक प्रकल्प, (१९०), सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना सहाय्य, (००), (००)(०१) आशियाई विकास बँक सहाय्यित शाश्वत किनारा संरक्षण व व्यवस्थापन गुंतवणूक कार्यक्रम (कार्यक्रम) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२७११ ०९२२)” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. २३०/२०२५/व्यय-८, दि.२७.०३.२०२५ नुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०३२७१८३५५१३७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NILIMA MAHADEV KAMBLE

Digitally signed by NILIMA MAHADEV KAMBLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=0a1748b905e770db90369b30966380ad4482c802aeb9a208c0273473e9c24d7e, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B635A0BA362D807D0A2AD2942C69531FAFE53ABFCAC9AB809231BD295B40EBE2, cn=NILIMA MAHADEV KAMBLE
Date: 2025.03.27 18:36:39 +05'30'

**( निलीमा कांबळे )**

**कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई.
२) वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई-३२.
३) नियोजन विभाग (का. १४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
४) अपर मुख्य सचिव (बंदरे), गृह विभाग.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८) कार्यासन अधिकारी, बीयुडी-१, गृह विभाग.
९) निवडनस्ती (बंदरे-२).